महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामधील उपअभियंता (स्थापत्य), गट-अ या पदावरील तात्पुरती पदोन्नती

# महाराष्ट्र शासन
## पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग
## शासन आदेश क्रमांकः मजीप्रा-२०१६/प्र.क्र.३६७/पापु-२३

७ वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई- ४०० ००१
तारीख: २९ ऑगस्ट, २०१८

**शासन आदेश :-**

जिल्हा परिषदेमधील ग्रामीण पाणी पुरवठा विभागांतर्गत कार्यरत असलेल्या कनिष्ठ अभियंता/ शाखा अभियंता यांना महाराष्ट्र जीवन प्राधिकरणामधील उपअभियंता (स्थापत्य) पदी पदोन्नतीची संधी उपलब्ध व्हावी म्हणून महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम, १९६१ व महाराष्ट्र जीवन प्राधिकरण अधिनियम, १९७६ नुसार जिल्हा परिषदेमधील पाणी पुरवठा विभागाचा आकृतीबंध दिनांक ०४ मार्च, २०११ च्या शासन निर्णयान्वये निश्चित करण्यात आलेला आहे. या आकृतीबंधानुसार जिल्हा परिषदेमध्ये उपअभियंता संवर्गाची २०६ पदे निर्माण करण्यात आली आहेत. जिल्हा परिषदेतील कनिष्ठ अभियंता/ शाखा अभियंता यांना उपअभियंता (स्थापत्य) पदी पदोन्नती देण्याकरिता दिनांक ३१ जुलै, २०१२ च्या आदेशान्वये १३६ पदे निश्चित करण्यात आली आहेत. त्यानुसार जिल्हा परिषदेमध्ये सहाय्यक कार्यकारी अभियंता/ सहाय्यक अभियंता श्रेणी-१ ही पदे सरळसेवेने, उपअभियंता (पदवीधर) ही पदे पदोन्नतीने तर उपविभागीय अधिकारी/ उपअभियंता (पदविकाधारक) ही पदे पदोन्नतीने भरण्याचे निश्चित केले असून त्याचे प्रमाण अनुक्रमे ३४: ३३: ३३ असे आहे.

०२. वरील परिच्छेदात नमूद केलेली वस्तुस्थिती विचारत घेऊन, जिल्हा परिषदेमधील खालील शाखा अभियंता (गट-ब, राजपत्रित) यांना सन २०१६-१७ या वर्षाच्या निवडसूचीमधून या आदेशाच्या दिनांकापासून “उपअभियंता (स्थापत्य)” गट-अ, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, वेतनश्रेणी रु.१५६००-३९१०० + ग्रेड वेतन रु.५४००/- या पदावर मा. सर्वोच्च न्यायालयामध्ये दाखल विशेष अनुमती याचिका क्रमांक २८३०६/२०१७ मधील अंतिम निकालाच्या अधीन राहून तात्पुरत्या स्वरूपात पदोन्नती देण्यात येत असून त्यांना स्तंभ क्रमांक ६ मध्ये दर्शविल्याप्रमाणे महसुली विभाग वाटप करण्यात येत आहेत. तसेच त्यांची पदस्थापना त्यांच्या नावासमोर स्तंभ क्रमांक ७ मध्ये दर्शविलेल्या कार्यालयामध्ये करण्यात येत आहे:-

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | अधिकाऱ्याचा मूळ प्रवर्ग | पदोन्नतीचा प्रवर्ग | सध्याचे कार्यालय | पदोन्नतीनंतर वाटप केलेला महसुली विभाग | उपअभियंता (स्थापत्य), म.जी.प्रा. पदावरील पदोन्नतीने पदस्थापना केलेले कार्यालय |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ४ | ५ | ६ | ७ |
| १ | श्री. सुनील शामराव पटेकरी (पदविकाधारक) | खुला | खुला | जिल्हा परिषद, पुणे | पुणे | ग्रामीण पाणी पुरवठा उपविभाग सातारा, जिल्हा परिषद, सातारा. |
| २ | श्री.विनायक बाबुराव पालकर (पदविकाधारक) | खुला | खुला | जिल्हा परिषद, जालना | औरंगाबाद | ग्रामीण पाणी पुरवठा उपविभाग अंबड, जि.प. जालना |

**०३.** उपरोक्त अधिकाऱ्यांची उपअभियंता (स्थापत्य), गट-अ या पदावर देण्यात आलेली पदोन्नती त्यांचेविरुध्द कोणत्याही प्रकारची विभागीय चौकशी प्रलंबित अथवा प्रस्तावित नाही, या धारणेच्या अधीन राहून देण्यात येत आहे.

**०४.** मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी याचिका क्रमांक २७९७/२०१५ मध्ये दिनांक ०४/०८/२०१७ रोजी दिलेल्या निर्णयान्वये पदोन्नतीमधील आरक्षण अवैध ठरविले आहे. मा.उच्च न्यायालयाच्या या निकालाच्या विरोधात राज्य शासनाने मा.सर्वोच्च न्यायालयात विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ दाखल केली आहे. ही याचिका अद्याप प्रलंबित आहे. याबाबत विधी व न्याय विभागाने खुल्या प्रवर्गातील कर्मचाऱ्यांना पदोन्नती देण्यास कोणतीही वैधानिक अडचण नसल्याचे अभिप्राय दिले आहेत. त्यानुसार सध्या पदोन्नती कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदे निव्वळ तात्पुरत्या स्वरूपात सेवाज्येष्ठतेनुसार मा.सर्वोच्च न्यायालयाच्या निर्णयाच्या अधीन राहून भरण्यात यावीत. अशी कार्यवाही करताना सेवाज्येष्ठता यादीमधील मागासवर्गीय अधिकारी/ कर्मचारी यांना पदोन्नती देण्यापूर्वी ते दिनांक २५/०५/२००४ च्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार आरक्षणाचा लाभ घेऊन सेवाज्येष्ठता यादीत वरच्या स्थानावर आले नाहीत, याची खात्री प्रत्येक प्रशासकीय विभागाने करण्याच्या सूचना सामान्य प्रशासन विभागाने दिनांक २९/१२/२०१७ रोजीच्या पत्रान्वये दिल्या आहेत. त्यानुसार महाराष्ट्र जीवन प्राधिकरणातील उपअभियंता (स्थापत्य) (पदविकाधारक) या पदावरील पदोन्नत्या मा.सर्वोच्च न्यायालयात दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्रमांक २८३०६/२०१७ मधील अंतिम निकालाच्या अधीन राहून पदोन्नती कोट्यातील खुल्या प्रवर्गातील रिक्त पदांवर निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात करण्यात येत आहे.

**०५.** वरील पदोन्नत उपअभियंता (स्थापत्य) यांनी पदोन्नतीच्या पदावरील त्यांच्या वेतननिश्चितीचा विकल्प पदोन्नतीच्या दिनांकापासून एक महिन्याच्या आत संबंधित कार्यालय प्रमुखाकडे सादर करावा. अशा प्रकारचा विकल्प न दिल्यास त्यांची वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम क्रमांक ११ (१) (ए) मधील तरतुदीनुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन केली जाईल.

**०६.** हे आदेश तात्काळ अंमलात येतील. पदोन्नत झालेल्या अधिकाऱ्यांना संबंधित कार्यालयाने तात्काळ कार्यमुक्त करून या विभागास कळवावे. तसेच पदोन्नत अधिकाऱ्यांनी पदस्थापना केलेल्या कार्यालयात तात्काळ रुजू व्हावे. पदस्थापनेत बदल करण्याच्या कोणत्याही विनंतीची दखल घेण्यात येणार नाही.

**०७.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक 201808241619379828 असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Mahesh Bhagwan Sawant

Digitally signed by Mahesh Bhagwan Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=d1f670a17d77c8ddff69694de2a07b7ff855dafef954aefa82ca28bd6cc6adb6, serialNumber=14841ecd32c757d5bdc1bc806fcf798e88e12bf053f8b2c43a5b1825ab9eb880, cn=Mahesh Bhagwan Sawant
Date: 2018.08.29 18:33:33 +05'30'

**(महेश भ. सावंत)**
उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

(१) श्री. सुनील शा. पटेकरी, शाखा अभियंता, जिल्हा परिषद, पुणे.
(२) श्री. विनायक बा. पालकर, शाखा अभियंता, जिल्हा परिषद, जालना.

**प्रत,**

१. मा.राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.मंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग), मंत्रालय, मुंबई.
४. मा.राज्यमंत्री (पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग), मंत्रालय, मुंबई.
५. मा.मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
६. प्रधान सचिव, सामान्य प्रशासन विभाग (सेवा), मंत्रालय, मुंबई.
७. प्रधान सचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय विभाग, मंत्रालय, मुंबई.

८. प्रधान सचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. सदस्य सचिव, महाराष्ट्र जीवन प्राधिकरण, मुंबई.
१०. संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे.
११. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, पुणे, सातारा, जालना.
१२. महालेखापाल, महाराष्ट्र-१, मुंबई.
१३. महालेखापाल, महाराष्ट्र-२, नागपूर.
१४. उपसचिव, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. उपसचिव, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग (सर्व), मंत्रालय, मुंबई.
१६. उपसचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७. उपसचिव, ग्रामविकास व जलसंधारण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१८. मुख्य अभियंता (सर्व), महाराष्ट्र जीवन प्राधिकरण.
१९. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, पुणे, सातारा, जालना.
२०. जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)
२१. सर्व मंत्रालयीन विभाग व त्यांच्या अधिपत्याखालील सर्व कार्यालय प्रमुख/ विभाग प्रमुख.
२२. निवडनस्ती, कार्यासन पापु-२३